मत्स्यबीज केंद्राचे नुतनीकरण करण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता....
सन २०१७-१८ साठी राष्ट्रीय कृषी विकास योजना (RKVY) अंतर्गत अर्थसहाय्य...

# महाराष्ट्र शासन
## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि २०१७/ प्र.क्र.८६ / पदुम १३
## मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
## दिनांक : २१ जून २०१७

**वाचा**

१) आयुक्त कार्यालयाचे पत्र क्र. मत्स्य/ भू/०२०९०१/०८/२०१७, दि. २०.०१.२०१७

२) राष्ट्रीय कृषि विकास कक्षाचे क्र. RKVY-१२१६/C.R. १४६/RKVY CELL, दि. ०८.०५.२०१७ रोजीच्या पत्रान्वये निर्गमीत केलेले इतिवृत्त

३) कृषि व पदुम विभागाचे क्र. आरकेव्ही- ०३१७/सी.आर. १४/आरकेव्हीवाय सेल, दि. ०९.०६.२०१७ अन्वये निर्गमित केलेले राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त

**प्रस्तावना**

राज्यात ४.१८ लाख हेक्टर गोडया पाण्याचे क्षेत्र उपलब्ध असून यामध्ये लहान-मोठे पाटबंधारे जलाशय / तलाव/ गाव तलाव यांचा समावेश आहे. राज्यातील हे उपलब्ध जलक्षेत्र मत्स्यव्यवसायासाठी विकसित करण्यासाठी दरवर्षी अंदाजे ११४.०० कोटी मत्स्यबोटुकलीची आवश्यकता असते.

प्रमुख कार्प व सामान्य कार्प जातीचे मत्स्यबीज निर्माण करण्यासाठी राज्यात एकूण ३० मत्स्यबीज उत्पादन केंद्र, १६ मत्स्य संवर्धन केंद्र व ४ कोळंबी बीज केंद्र अशी एकूण ५० केंद्रे उपलब्ध आहेत. सदर केंद्रांची निर्मिती सन १९८० ते १९९० च्या दरम्यान झालेली आहे. प्रत्येक मत्स्यबीज उत्पादन केंद्राची क्षमता ही ७.०० कोटी मत्स्यजिरे निर्माण करण्याची असून, त्याप्रमाणे ३० मत्स्यबीज उत्पादन केंद्रामधून २१० कोटी मत्स्यजिरे निर्माण होतात. सदर २१० कोटी मत्स्यजीराच्या ३०% मत्स्यबीज म्हणजे अंदाजे ६०.०० कोटी मत्स्यबीज तयार होतील. सदर मत्स्यबीजाच्या ५० टक्के म्हणजेच अंदाजे ३० कोटी मत्स्यबोटुकली तयार होतील. मात्र सदर मत्स्यबीज उत्पादन केंद्रांतील सद्यस्थितीत पाणी पुरवठा व्यवस्था निरुपयोगी होणे, फिल्टर चेंबर्स नादुरुस्त असणे, मत्स्यबीज संचयन / संगोपन तलाव सुस्थितीत नसणे तसेच हॅचरी शेड मोडकळीस येणे, सदरची केंद्रे ही दीर्घकाळ वापरात असल्याने तलावात गाळ साचणे, इत्यादी बाबींमुळे सद्यस्थितीत पुर्ण क्षमतेने मत्स्यबीज उत्पादन घेणे शक्य होत नाही. यासाठी सदर मत्स्यबीज उत्पादन केंद्रांची सुधारणा करणे आवश्यक झाले होते.

उक्त वस्तुस्थिती लक्षात घेऊन संदर्भाधीन १ येथील पत्रान्वये आयुक्त मत्स्यव्यवसाय यांनी उपलब्ध ४६ मत्स्यबीज उत्पादन केंद्रापैकी काटेपूर्णा (जि.अकोला), नागठाणा (जि.भंडारा), इटियाडोह (जि.गोंदिया) व कोराडी (जि.बुलढाणा) या ४ मत्स्यबीज उत्पादन केंद्राच्या (३ मत्स्यबीज उत्पादन केंद्र व १ मत्स्य संवर्धन केंद्र) नुतनीकरणाचा रू. ६.२५ कोटी इतक्या रकमेच्या सविस्तर

प्रकल्प अहवाल राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत अर्थसहाय्यासाठी शासनास सादर केला आहे. सदर प्रकल्प अहवाल दि. १३.०१.२०१७, दि. ०४.०२.२०१७ व दि. ०३.०३.२०१७ रोजीच्या राज्यस्तरीय प्रकल्प छाननी समितीसमोर सादर करण्यात आले असता संदर्भाधीन क्र. २ येथील पत्रान्वये निर्गमीत करण्यात आलेल्या इतिवृत्तांन्वये त्यास मान्यता देण्यात आलेली आहे. तद्नंतर सदर प्रस्ताव दि. २५.०५.२०१७ रोजीच्या राज्य प्रकल्प मंजुरी समितीसमोर ठेवण्यात आले असता त्यास संदर्भाधीन क्र. ३ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांनी सादर केलेला प्रस्ताव व राज्य प्रकल्प मंजुरी समितीने दिलेली मान्यता लक्षात घेता राज्यातील ४ मत्स्यबीज उत्पादन केंद्राचे नुतनीकरण करण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

शासन या निर्णयान्वये केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषी विकास योजनाअंतर्गत (RKVY) प्राप्त होणाऱ्या अर्थ सहाय्यातुन खालीलप्रमाणे राज्यातील ४ मत्स्यबीज उत्पादन केंद्रांच्या नुतनीकरण करण्यासाठी राकृवियो अंतर्गत १०० टक्के अर्थसहाय्याने रु. ६.२५ कोटी रक्कमेच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देत आहे.

| अ. क्र. | मत्स्यबीज केंद्र | प्रकल्प किंमत (रू. कोटी) | बाब | राकृवियो हिस्सा १००% (रू. कोटी) |
|---|---|---|---|---|
| १ | काटेपूर्णा (जि. अकोला) | २.०० | १) हॅचरी शेड बांधकाम<br>२) तळ्यांची दुरुस्ती व बांधकाम<br>३) केंद्रातील रस्ते बांधकाम<br>४) ऑफिस बिल्डींग व निवासस्थान दुरुस्ती | २.०० |
| २ | नागठाणा (जि. भंडारा) | ०.४५ | १) मत्स्यतळ्यांचे बांधकाम व दुरुस्ती<br>२) शासकीय निवासस्थानाची दुरुस्ती<br>३) विद्युतीकरण | ०.४५ |
| ३ | इटियाडोह (जि. गोंदिया) | ३.३० | १) कार्यालयीन इमारत, हॅचरी, कर्मचारी निवासस्थान याचे नुतनीकरण<br>२) पाणीपुरवठा, फिल्टर चेंबर, पाईपलाईन बांधकाम व दुरुस्ती<br>३) पोचमार्ग व आंतरिक मार्ग<br>४) विद्युतीकरण, डिझेल जनरेटर<br>५) तळ्याचे नुतनीकरण | ३.३० |
| ४ | कोराडी (जि. बुलढाणा) | ०.५० | १) पाईपलाईन दुरुस्ती<br>२) प्रशासकीय इमारत व लॅबोरेटरीचे नूतनीकरण<br>३) नर्सरी तळे दुरुस्ती<br>४) पाणीसाठा तळी बांधकाम | ०.५० |
| **एकूण** | | **६.२५** | | **६.२५** |

आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई हे उपरोक्त प्रकल्पाचे संनियंत्रण अधिकारी राहतील. प्रकल्प विहित कालावधीत पूर्ण करण्याची व उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्याची जबाबदारी ही आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६२२१५३३०६६७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shri Ravindra Gurav

Digitally signed by Shri Ravindra Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And Adf Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0030b22364370f4d96ab251b7263219586c0069b661c3f9cd6fd67e55000ce92, cn=Shri Ravindra Gurav
Date: 2017.06.22 15:33:33 +05'30'

**(र. व. गुरव)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
३. मा. राज्यमंत्री(पदुम) यांचे खाजगी सचिव
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा व विधानपरिषद.
५. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. प्रादेशिक उपायुक्त, मत्स्यव्यवसाय, अमरावती/नागपूर
८. सहायक आयुक्त, मत्स्यव्यवसाय, अकोला/भंडारा/गोंदिया/ बुलढाणा
९. महालेखापाल १ /२, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) मुंबई / नागपूर
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला/भंडारा/गोंदिया/ बुलढाणा
११.उप कोषागार अधिकारी, अकोला/भंडारा/गोंदिया/ बुलढाणा
१२.सहसंचालक, लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर,मुंबई
१३.अवर सचिव/ कक्ष अधिकारी (राकृवियो कक्ष,पदुम १२, पदुम १४, पदुम १६)
१४.निवडनस्ती